RNI No. MAHBIL /2009/37831




# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण भाग चार–ब

वर्ष २, अंक १२९] मंगळवार, ऑक्टोबर ४, २०१६/आश्विन १२, शके १९३८ [पृष्ठे २, किंमत : रुपये ९.००

### असाधारण क्रमांक २५७

## प्राधिकृत प्रकाशन

**महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र अधिनियमांन्वये तयार केलेले**
**(भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

## ग्रामविकास व जलसंधारण विभाग

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई ४०० ००१, दिनांक ४ ऑक्टोबर २०१६

**आदेश**

**महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१.**

क्रमांक झेडपीबी-२०१५/प्र.क्र.९/भाग (१)/(४)/पं.रां. ५.—ज्याअर्थी, महाराष्ट्र नगर परिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ (१९६५ चा महा. ४०) याच्या कलम ३४१अ चा पोट-कलम (१) व (१अ) द्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून काढण्यात आलेली शासकीय अधिसूचना नगरविकास विभाग क्र. एमयुएम २०१६/प्र.क्र. ९९ (भाग-२)/नवि-१७, दिनांक ६ सप्टेंबर २०१६ (यात यापुढे जिचा " उक्त अधिसूचना " असा निर्देश करण्यात आला आहे.) अन्वये उक्त अधिनियमाच्या कलम ३४१ अ चा पोट-कलम (१), (१क) आणि (२) मध्ये तरतूद केल्याप्रमाणे महाराष्ट्र शासनाने अहमदनगर जिल्ह्यातील नेवासा खुर्द महसुली गावाचे स्थानिक क्षेत्र हे लहान नागरी क्षेत्र म्हणून विनिर्दिष्ट केले आहे आणि त्याकरिता उक्त अधिनियमाच्या कलम ३४१ क चे पोट-कलम (१), (१ब) आणि (२) मध्ये तरतूद केल्याप्रमाणे नेवासा नगरपंचायत या नावाने नगरपंचायत गठित करण्यात आली आहे ;

आणि ज्याअर्थी, उक्त अधिसूचनेस अनुसरुन महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ (१९६२ चा पाच) याच्या कलम २५५ च्या पोट-कलम (२) चा खंड (सहा) अन्वये विद्यमान स्थानिक प्राधिकरणाची मत्ता, हक्क आणि दायित्वे (त्याने केलेला कोणताही करार किंवा संविदा या खालील हक्क व दायित्वे धरून) उत्तराधिकारी स्थानिक प्राधिकरणाकडे हस्तांतरित करण्याचा आदेश देणे इष्ट आहे.

त्याअर्थी, आता, महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम, १९६१ याच्या कलम २५५ च्या पोट-कलम (२) चा खंड (सहा) द्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून महाराष्ट्र शासन याद्वारे, असा निदेश देते की, अहमदनगर जिल्ह्यातील नेवासा खुर्द महसुली गावासंबंधात अहमदनगर जिल्हा परिषदेच्या सर्व मत्ता, हक्क आणि दायित्वे (तिने केलेला कोणताही करार किंवा संविदा या खालील हक्क व दायित्वे धरून) ही, शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्रमांक-एमपीएच १९९७/सीआर-६४५/५६(४७), दिनांक २० जुलै १९९९ यामध्ये विनिर्दिष्ट केलेल्या अटी व शर्तीवर नेवासा नगर पंचयातीकडे हस्तांतरित झाल्याप्रमाणे असतील आणि तिच्याकडे निहित असतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**संजय बनकर,**
शासनाचे उप सचिव.

**RURAL DEVELOPMENT AND WATER CONSERVATION DEPARTMENT**

Bandhkam Bhavan, 25 Marzban Path, Fort, Mumbai 400 001

Dated the 4th October 2016.

## Order

MAHARASHTRA ZILLA PARISHAD AND PANCHAYAT SAMITI ACT, 1961.

No. Zpb-2015/CR-9/part1/(4) PR 5.— Whereas, the Government of Maharashtra, under the Notification, Urban Development Department, No. MUM-2016/CR-99 (part 2)/UD-17, dated 6th September 2016 (hereinafter referred to as " The said Notification ") issued in exercise of the powers conferred by sub-sections (*1*), (*1A*) and (*2*) of section 341 A of the Maharashtra Municipal Councils, Nagar Panchayats and Industrial Townships Act, 1965 (Mah. XL of 1965), has specified the local area of revenue village of Nevasa Khurd in Ahmednagar district to be a transitional area, for which a Nagar Panchayat as provided in sub-sections (*1*), (*1B*) and (*2*) of Section 341 A of the said Act, by the name of the Nevasa Nagar Panchayat, is constituted ;

And Whereas, pursuant to the said notification, it is expedient to issue an order for transfer of assets, rights and liabilities of the existing local authority (including the rights and liabilities under any agreement or contract made by it) to the successor local authority under clause (vi) of sub-section (*2*) of section 255 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samities Act, 1961 (Mah. V of 1962).

Now, therefore, in exercise of the powers conferred by clause (vi) of sub-section (*2*) of section 255 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samities Act, 1961 (Mah. V of 1962), and of all other powers enabling it in that behalf, the Government of Maharashtra hereby directs that all the assets, rights and liabilities of the Ahmednagar Zilla Parishad, in respect of the revenue village Nevasa Khurd in Ahmednagar District (including the rights and liabilities under any agreement or contract made by it) shall stands transferred to and shall vest in the Nagar Panchayat of Nevasa, on the terms and conditions specified in the Government Resolution, Rural Development and Water Conservation Department, No. MPH-1997/CR-645/56(47), dated the 20th July 1999.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

SANJAY BANKAR,
Deputy Secretary to Government.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004, EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.